**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत “आपलं मंत्रालय” या नावाचे मासिक खाजगीरित्या मुद्रीत करुन घेणे, आवेष्टन इ. तसेच छपाईच्या कामास मंजूरी देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मावज-२०२२/प्र. क्र.१७३/कार्या-३४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १६ मे ,२०२३.

**वाचा :-**

शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.मावज-२०१६/प्र.क्र.२७९/३४, दिनांक २१.०७.२०१७.

**प्रस्तावना :-**

मा.राज्यपाल मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.मुख्य सचिव, मंत्रालयीन विविध विभागाचे सचिव यांच्या मंत्रालयात झालेल्या कार्यक्रमाची/बैठकीची माहिती तसेच मंत्रालयात होणाऱ्या घडामोडीबरोबरच मंत्रालयीन अधिकारी/कर्मचारी यांच्या यशाची गाथा, कर्तृत्वाचा आलेख, पदोन्नतीची माहिती, निवृत्तीची खबर शासकीय कामकाज करताना नावीन्यपूर्ण कामगिरी केली असल्याबाबतची माहिती इत्यादी बाबींचा समावेश असलेले “आपलं मंत्रालय” हे मासिक नियमितपणे सुरु करण्यास शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.मावज-२०१६/प्र.क्र.२७९/३४, दिनांक २१.०७.२०१७ अन्वये मान्यता देण्यात आली. तथापि, सदर मासिकाचे नियमितपणे प्रकाशन सुरु असताना कोविड-१९ लॉकडाऊनच्या कालावधीत या मासिकासाठी सुरु असलेली सन २०१९-२० साठीची ई-निविदा प्रक्रिया स्थगित करण्यात आली होती. त्यामुळे सदर मासिक काही कालावधीसाठी बंद ठेवण्यात आले होते. आता, सदर मासिक पुनश्च: सुरु करण्याची बाब विचाराधीन होती. तथापि, शासकीय मुद्रणालयात चार रंगी छपाई यंत्रणा उपलब्ध नसल्यामुळे तसेच सदरचा अंक मासिक असल्यामुळे विहित कालावधीमध्ये छपाई व बांधणी करुन पुरवठा करण्यासाठी आवश्यक असणारे पुरेसे मनुष्यबळ शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई या मुद्रणालयात उपलब्ध नसल्यामुळे सदरहू मासिकाची खाजगी मुद्रणालयाकडून छपाई करुन घेण्यास उदयोग, ऊर्जा व कामगार विभागाने मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णय:-**

शासकीय मुद्रणालयात चार रंगी छपाई यंत्रणा उपलब्ध नसल्याने माहे मे, २०२३ ते मार्च, २०२४ या कालावधीसाठी “आपलं मंत्रालय” या मासिकाची छपाई ई-निविदा मागवून व विहित शासन कार्यपध्दतीचा अवलंब करुन खाजगी मुद्रणालयाकडून करुन घेण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. “आपलं मंत्रालय” या मासिकाच्या छपाईसाठी येणारा खर्च, सामान्य प्रशासन विभाग क्र.ए.-६-२२२०, माहिती व प्रसिध्दी-०१,चित्रपट-००१, संचालन व प्रशासन, (००)(०१)प्रसिध्दी संचालक, १६-प्रकाशने, संगणक सांकेतांक (२२२० ००४३) या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ वर्षामधील मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन भागविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय शासकीय मुद्रण, लेखन सामग्री व प्रकाशन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या दिनांक २० सप्टेंबर, २०२२ च्या पत्रान्वये दिलेल्या सहमतीने तसेच उदयोग, ऊर्जा व कामगार विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४६/उदयोग-४, दिनांक ०७.११.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५१६१२५८१६८४०७ असा आहे. . हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RIMA SUBHASH DUTTAROY

Digitally signed by RIMA SUBHASH DUTTAROY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=487393c812e41c98e63a7a73c63e1d078da4c3c899b4307a07d4d99b40a7d635, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B813A4CECE1744D0527A20F20D15FC2FFC7D4457A8AE2120E0D35781B42C049C, cn=RIMA SUBHASH DUTTAROY
Date: 2023.05.16 12:58:46 +05'30'

**(रिमा दत्तरॉय)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रतः-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. प्रधान सचिव,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सर्व संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
५. महालेखापाल,१, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), १/२ मुंबई/नागपूर
६. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई, नागपूर.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सर्व मंत्रालयीन विभाग,
९. उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती कार्यासन-३४.